**इयत्ता ११ वी व १२ वी सुधारित विषय योजना व मूल्यमापन योजना - फक्त सैनिकी शाळांसाठी "सामान्य ज्ञान" (General Knowledge) विषयाचा समावेश करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२०/प्र.क्र.२०२/एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० ऑक्टोबर,२०२१.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.(२४३/१९)एसडी -४, दि.०८ ऑगस्ट, २०१९ (११ वी, १२ वी)
२) शासन निर्णय दि.०८.०८.२०१९ चे शुद्धिपत्रक, दि.११.११.२०१९.
३) शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०२१/प्र.क्र.९/एस.डी.४, दि.१८ जानेवारी,२०२१.

<u>प्रस्तावना :</u>

दि. ०५ जुलै, २००२ च्या शासन निर्णयानुसार शैक्षणिक वर्ष २००२-०३ पासून सैनिकी शाळांसाठी **"सामान्यज्ञान"**(General Knowledge ) हा विषय घेण्यास अनुमती दिलेली आहे. तेंव्हापासून **"सामान्यज्ञान"**(General Knowledge ) हा विषय फक्त सैनिकी शाळांमध्ये शिकविला जात होता.

तथापि दि.०८ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयानुसार सुधारित अभ्यासक्रम व पाठ्यक्रमासाठी सन २०१९- २० पासून इ.११ वी साठी व सन २०२०- २१ पासून इ.१२ वी साठी सुधारित विषय योजना व मूल्यमापन योजना निश्चित करण्यात आलेली आहे. सदर विषययोजनेत फक्त सैनिकी शाळांसाठी असलेला **"सामान्यज्ञान"**(General Knowledge ) हा विषय वगळण्यात आला आहे.

परंतू इतिहास, भूगोल, संरक्षणशास्त्र, सामान्य क्षमता व सामान्य ज्ञान इत्यादी विषयातील अद्ययावत ज्ञान, दैनंदिन घडामोडींची माहिती देण्यासाठी सदर विषय उपयुक्त असल्याने **सामान्यज्ञान** (General Knowledge) हा विषय सैनिकी शाळांमध्ये पूर्वीच्या विषय योजनेप्रमाणे सुरु ठेवण्याची मागणी करण्यात येत आहे.

सैनिकी शाळांमध्ये **सामान्यज्ञान** (General Knowledge) या विषयाच्या अध्यापनाची प्रमुख उद्दिष्टे खालील प्रमाणे आहेत.

१) विद्यार्थ्यांना स्वयं अध्ययनाची सवय निर्माण होण्यास मदत करणे.
२) विद्यार्थ्यांची एनडीए व इतर स्पर्धा परीक्षेसाठी क्षमता विकसित करणे.
३) विद्यार्थ्यांमध्ये राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील घडामोडींसाठी विद्यार्थ्यांना जागृत करणे.
४) विद्यार्थ्यांमध्ये सैन्य दलात सामील होण्यास आवड निर्माण करणे.

५) विद्यार्थ्यांमध्ये सशस्त्र सेना व निमलष्करी दलात अधिकारी भरतीसाठी ज्ञान प्राप्त करणे.
६) विद्यार्थ्यांमध्ये नेतृत्व गुण वाढ होण्यास मदत करणे.
७) विद्यार्थ्यांमध्ये समृद्ध राष्ट्रीय संस्कृती व वारसा या विषयी जागरूकता निर्माण करणे.
८) राष्ट्रीय व आंतराष्ट्रीय स्तरावरील महत्वाच्या घटना, घडामोडी जाणून घेण्याविषयी विद्यार्थ्यांमध्ये क्षमता विकसित करणे.

या अनुषंगाने इ.११ वी व इ.१२ वी सुधारित विषय योजना व मूल्यमापन योजनेमध्ये **"सामान्यज्ञान"** (General Knowledge ) हा विषय फक्त सैनिकी शाळांसाठी पूर्वी प्रमाणे सुरु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

या अनुषंगाने इ.११ वी व इ.१२ वी सुधारित विषय योजना व मूल्यमापन योजनेमध्ये फक्त सैनिकी शाळांसाठी **"सामान्यज्ञान"** (General Knowledge ) हा विषय सामान्य ज्ञान या विषयासाठी नव्याने स्वतंत्र शिक्षकाची नियुक्ती करण्यात येणार नाही या अटीवर पूर्वी प्रमाणे सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात येत असून सदर विषयाचा समावेश शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.२४३/एसडी-४, दि.०८ ऑगस्ट, २०१९ च्या Annexure – A मधील ग्रुप (A) मध्ये असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११०२०१७०६१८३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

RAJENDRA
SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.10.20 17:09:11 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१. मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री,शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,
३. अपर मुख्य सचिव ,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
४. आयुक्त ( शिक्षण ),महाराष्ट्र राज्य,पुणे
५. संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र, पुणे .
६. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,महाराष्ट्र राज्य ,पुणे.
७. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ),महाराष्ट्र राज्य, पुणे

८. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
९. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
१०. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
११ .सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक ), जिल्हा परिषद ( सर्व )
१२. शिक्षण निरिक्षक, मुंबई (पश्चिम,दक्षिण,उत्तर)
१३. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-४)